गझल गायिका व शास्त्रीय संगीत गायिका शोभा गुर्टु यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त सांस्कृतिक कार्यक्रमाच्या आयोजन खर्चास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

## शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२४/प्र.क्र.३१५ (ई.नं.९१८८५८)/सां.का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०३ मार्च, २०२५

**संदर्भ** :- पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ८२२४/ प्र.क्र.३१५/सां.का.४, दि. ७ जानेवारी, २०२५

**प्रस्तावना :-**

सांस्कृतिक कार्य विभागामार्फत कला व कलेशी संबंधित मान्यवरांच्या हिरक, सुवर्ण व शताब्दी वर्षाच्या औचित्यावर त्यांचा गौरव व्हावा आणि त्या कलाकृतींचा तरुण रंगकर्मींच्या माहितीसाठी प्रचार व प्रसार व्हावा या हेतूने त्यांच्या संबंधीचे सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येत असते. याच पार्श्वभुमीवर, गझल गायिका व शास्त्रीय संगीत गायिका शोभा गुर्टु यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यास उपर्निर्दिष्ट संदर्भाधिन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता सदर कार्यक्रम आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गझल गायिका व शास्त्रीय संगीत गायिका शोभा गुर्टु यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त ३ दिवसीय सांस्कृतिक कार्यक्रमाचा आयोजन खर्च रुपये २२,५०,०००/- ( अक्षरी रुपये बावीस लक्ष पंन्नास हजार फक्त ) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर आयोजन खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व दि. १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३०३१७५४०४०३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.03 17:54:56 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४